**सन २०१६-१७ मध्ये महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास नाफेडच्या वतीने तेलबीया व कडधान्य खरेदी केलेल्या मालाचे चुकारे शेतकऱ्यांना अदा करण्यासाठी उभारावयाच्या रु.१०० कोटीच्या कर्जास शासन हमी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०१७/ सपववि /प्र.क्र. १३/अर्थबळ,**
मंत्रालय, मुंबई-३२
दिनांक :- २३ जानेवारी, २०१७

**वाचा** -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८
३) सरव्यवस्थापक यांचे क्र.अन्नधान्य/नाफेड खरेदी कर्ज/२०१६-१७/१३४९ दि.१०/१/२०१७ चे पत्र.

**प्रस्तावना:**

केंद्र शासनाने नाफेड या संस्थेची सन २०१६-१७ मध्ये आधारभूत दराने विविध कडधान्ये, तृणधान्ये, तेलबिया यांची खरेदी करण्यासाठी प्रमुख अभिकर्ता म्हणून नेमणूक केली आहे. नाफेडने सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्यात महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यदित, मुंबई यांची उपअभिकर्ता म्हणून नियुक्ती केली आहे. नाफेडमार्फत पणन महासंघाकडून आधारभूत किंमत योजनेअंतर्गत खरेदी होत असलेल्या शेतमालाची रक्कम उशिराने प्राप्त होत असल्याने शेतकऱ्यांचे चुकारे जलदगतीने अदा करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास युनियन बँक ऑफ इंडिया, शाखा भारत बाजार यांचेमार्फत रु.१०० कोटी (रुपये शंभर कोटी ) इतके कर्ज उभारण्यास शासन हमी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

किमान आधारभूत किंमत योजने अंतर्गत हंगाम २०१६-१७ मध्ये नाफेडमार्फत खरेदी होणा-या शेतमालाचे शेतकऱ्यांना चुकारे अदा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई (ऋणको) यांना रु.१०० कोटी (अक्षरी रुपये शंभर कोटी ) इतके कर्ज युनियन बँक ऑफ इंडिया, शाखा भात बाजार या बँकेकडून (धनको) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या मान्यतेने उभारण्यासाठी शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर शासनहमीची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या कालावधीपर्यंत वैध राहील.

३. धनको बँकेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा. करारनाम्याशिवाय **किंवा करारनामा स्वाक्षरीत होण्यापूर्वी बँकेने कर्ज संवितरीत केल्यास शासन हमी अवैध ठरेल.**

३.१) शासन हमी एकूण रु. १०० कोटी इतक्या कर्जाच्या रकमेपुरतीच सिमीत राहील.

३.२) सदर शासनहमीची मुदत शासन निर्णय निर्गमित केल्याच्या दिनांकापासून ६ महिन्याच्या कालावधीपर्यंत वैध राहील.

३.३) बँकांकडून प्राप्त होणारे कर्ज, नाफेड कडून प्राप्त होणारी रक्कम तसेच शेतक-यांना वितरीत करावयाची रक्कम व बँकांची परतफेड याकरिता कर्ज देणाऱ्या धनको बँकांमध्ये महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि.मुंबई या संस्थेच्या नावे स्वतंत्र Escrow A/C उघडण्यात येईल व या अकाऊन्ट मधून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यात येईल.

३.४) धनको बँकांकडील कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

३.५) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. कडून कर्ज फेडीत कसूर झाल्यास कर्जाच्या वसूली करीता पुरेशा मत्तेची प्रतिभूती (Security) घेतल्यानंतरच धनको बँक कर्ज मंजूर करतील. सदर मत्तेची तपासणी वेळोवेळी व कमीत कमी सहा महिन्यातून एकदा तरी संबंधित बँक करेल.

३.६) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. कडून कर्ज फेडीत कसूर झाल्यास फेडरेशनच्या चल / अचल मालमत्तेची विक्री / लिलाव (Auction) करुन कर्ज वसुलीची प्रक्रिया पूर्ण करावी. तसेच, कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय धनको बँकेला हमीपूर्ततेकरिता शासन हमीच्या प्रतिभूतीचा वापर करता येणार नाही.

३.७) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. कडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणा-या कसुरीची सूचना शासनास ९० दिवसाच्या आत देणे धनको बँकेस बंधनकारक असेल.

३.८) धनको बँक राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांना आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाहीत. तसेच सदर प्रयोजनासाठी ऋणको इतर कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणार नाही.

३.९) धनको बँकेकडून महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. चल / अचल मालमत्तेची विक्री वसुलीचा निर्णय झाल्यास त्यासाठी एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग व वित्त विभागाचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा. चल / अचल मालमत्तेची विक्री/ लिलाव करताना मुल्यांकन त्रयस्थ संस्थेकडून शासन नियमानुसार करणे आवश्यक राहील. तसेच, उक्त समितीमधील शासनाच्या दोन्ही प्रतिनिधींच्या अहवालासह लिलाव प्रक्रियेचे अंतिमीकरणास शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहिल.

वरील (३.१) ते (३.९) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

**४.** महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांना रु. १०० कोटीची शासन हमी अ.क्र. १ येथील दिनांक ५.११.१९९९ मधील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील:-

४.१) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. हे Principal Debtor राहतील.

४.२) धनको बँकांकडून घेण्यात येणा-या कर्जाचा वापर शेतक-यांचे चुकारे वेळीच अदा करण्याकरिता करण्यात यावा.

४.३) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांनी खरेदी केलेल्या मालाचे चुकारे अदा करण्यासाठी लागणारी रक्कम विचारात घेऊन आवश्यक तेवढयाच कर्जाची उचल करण्यात यावी.

४.४) कर्जाच्या व्याजाचा दर कमीतकमी असेल याची खात्री करण्याची संपूर्ण जबाबदारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची राहिल.

४.५) सदरचे कर्ज (मुद्दल + व्याज) फेडण्याची संपूर्ण जबाबदारी नाफेड व महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ यांची संयुक्तपणे राहिल.

४.६) सदर शासन हमीवर देण्यात आलेल्या कर्जाचे दायित्व शासनावर येणार नाही याबाबत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने दक्षता घ्यावी.

४.७) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांनी दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती सहकार, पणन व वस्त्रोद्योग / वित्त विभागाकडे सादर करावी.

४.८) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांनी विहित कार्यपध्दतीने लेखा परिक्षित केलेल्या त्यांच्या लेख्यांची एक प्रत शासनास सादर करावी.

५. <u>हमी शुल्क</u>

५.१) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांनी घेतलेल्या कर्जावरील हमी शुल्काचा दर प्र.श.प्र.व. रु.२/- असा राहील.

५.२) हे हमीशुल्क ज्या कालावधीकरिता देय राहिल त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर देय राहील.

५.३) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यानी करण्यास महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१ मार्च आणि/ अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या कर्जावर देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा अनुक्रमे १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

५.४) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. कडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

५.५) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांनी शासन हमी शुल्काची रक्कम "००७५-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-१०८-हमी शुल्क" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. यांनी महामंडळाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री करुन घ्यावी.

५.६) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची साक्षांकित प्रत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाने वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

५.७) शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत व नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

६. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र. सपस-२०१६/प्र.क्र.१२०/२४-स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र. ४/२०१६-१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ लि. मुंबई यांनी कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत सहसचिव/ उपसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१७०१२३१६२६००७२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Narayan Gangurde

Digitally signed by Subhash Narayan Gangurde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2bccb7fb4f0c7cbcfe1afc1a1ea8ccd49981e3a99eef6ca123744c0bceaa80a4, cn=Subhash Narayan Gangurde
Date: 2017.01.23 16:30:52 +05'30'

**( सुभाष ना. गांगुर्डे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपालाचे सचिव,
२) मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,
३) उपमुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव,

४) प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई.
५) प्रबंधक, लोक आयुक्त महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६) प्रबंधक, उप लोक आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
७) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
८) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
९) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय,मुंबई (५ प्रती)
११) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ,मुंबई.
१२) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई
१३) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश,सी.डी.ओ.बॅरेक्स क्र १, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट, मुंबई- ४०००२०,
१४) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई- ४०० ००४,
१५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोव मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३,
१६) इंडियन नॅशनल कॉंग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन,काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- ४०००२५,
१७) नॅशनॅलिस्ट कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई- २१,
१८) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८,
१९) अ.मु.स. ( पणन ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२०) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी कापूस उत्पादक पणन महासंघ मर्या.,खेतान भवन, ६ वा मजला, १९८ जमशेदजी टाटा रोड, रिट्स हॉटेल समोर, चर्चगेट, मुंबई-२०
२१) वित्त विभाग (साउ /व्यय-२ /ऋण व हमी नियंत्रण कक्ष), मंत्रालय, मुंबई.
२२) कार्यासन अधिकारी, १० स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई--४०० ०३२.
२३) राष्ट्रीयकृत बॅंका, (सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागामार्फत)
२४) निवड नस्ती -अर्थबळ.

***********